**कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियानाची सन २०२१-२२ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी अनुसुचित जाती प्रवर्गाचा ₹. ३,१०,५०,०००/- एवढा निधी वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि,पशुसंवर्धन,दुग्ध विकास व मत्स्य व्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र. राफअ-२०२२/प्र.क्र. ३६/९-अे**

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२

दिनांक : २८ मार्च, २०२२

**संदर्भ:-**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: राफअ २०२१/प्र.क्र.१४०/९-अे, दि.२७ जुलै, २०२१

२) केंद्र शासनाच्या कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभागाचे इंग्रजी पत्र F.No. 18-24/2017-MIDH(E), Dated:02 February, 2022

३) संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे चे क्र.मराफऔवमं/लेखा/पहिला हप्ता मागणी/४६६२/२०२२, दि.०८.०२.२०२२ चे पत्र.

४) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१७ मार्च, २०२२

५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक: बीजीटी-२०२१/प्र.क्र.१३/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक २४ मार्च, २०२२

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने दिनांक १ एप्रिल २०१४ पासून राष्ट्रीय फलोत्पादन अभियान (NHM), उत्तर पूर्व आणि हिमालयीन राज्यासाठी फळबाग अभियान (HMNEH), राष्ट्रीय बागवानी मंडळ (NHB), नारळ विकास मंडळ (CDB) व केंद्रीय फलोत्पादन संस्था (CIH) या सर्व योजनांचे एकत्रिकरण करुन एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (Mission for Integrated Development of Horticulture) राबविण्याचा निर्णय घेतला आहे. सदर योजना ही फळे, भाजीपाला, कंदमुळे, मश्रूम, मसाले, फूल, सुगंधी वनस्पती, नारळ, काजू, कोको आणि बांबू इ. उत्पादनांच्या चतुरस्त्र विकासाकरिता राबविण्यात येणारी केंद्रपुरस्कृत योजना आहे. सदर योजना सन २०१५-१६ पासून केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० या प्रमाणात राबविण्यात येत आहे.

राज्यात एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान सन २०२१-२२ मध्ये राबविण्यासाठी ₹ १७८,१४,१२,०००/- रक्कमेच्या वार्षिक कृती आराखडयास संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाने संदर्भाधीन क्रमांक २ येथील पत्रान्वये अनुसुचित जाती प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा निधी रु. १,८६,३०,०००/- निधी राज्य शासनास वितरित केला असून त्या समरुप राज्य शासनाचा रु. १,२४,२०,०००/- निधी असा एकूण रु. ३,१०,५०,०००/- एवढा निधी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषि), पुणे यांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१. कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियानाची सन २०२१-२२ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी अनुसुचित जाती प्रवर्गाचा केंद्र हिश्शाचा

रु. १,८६,३०,०००/- निधी व त्यास समरुप राज्य हिश्शाचा रु. १,२४,२०,०००/- निधी असा एकूण रु. ३,१०,५०,०००/- (रुपये तीन कोटी दहा लाख पन्नास हजार फक्त) इतका निधी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषि), पुणे यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा अर्थसंकल्पित निधी केंद्र शासनाने विहीत केल्याप्रमाणे अनुसुचित जाती प्रवर्गासाठी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा (६० टक्के) | राज्य हिस्सा (४० टक्के) |
|---|---|---|
| अनुसुचित जाती | मागणी क्र. - एन -०३<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(००) (७८९) - अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्याक्रमांतर्गत योजना<br>(०१) (०१) कृषि उन्नती योजना एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१ B०८१) | मागणी क्र. - एन -०३<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(००) (७८९)- अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्याक्रमांतर्गत योजना<br>(०१) (०२) कृषि उन्नती योजना एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम)<br>३३ -अर्थसहाय्य (२४०१ B०९९) |

३. सदर अभियानाकरिता वितरित करण्यात आलेला निधी कोषागारातून आंहरित करण्याकरिता लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषी), पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/प्रक्रियांचे/वित्तीय अधिकाराच्या मर्यादेत/प्रचलित शासन निर्णय, नियम, परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकारांचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी क्षेत्रीय कार्यालयाची राहील.

५. या योजनेअंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठविणेबाबत दक्षता घ्यावी.

६. विभागप्रमुख/नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

८. प्रस्तुत आदेश शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३, दिनांक १७ मार्च, २०२२ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेले अधिकार तसेच, शासन निर्णय, सामाजिक न्याय व

विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: बीजीटी-२०२२/प्र.क्र.१३/अर्थसंकल्प (विघयो), दिनांक २४ मार्च, २०२२ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२८१५१२४७७९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BABURAO MAHADU ASOLE

Digitally signed by BABURAO MAHADU ASOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=225c6caaa4fd8ec882bd3bee9539413914b44aad4058d0b3d6d153454b385353,
pseudonym=7BBE5961D0F8CD6221BA971FB46E978F56C2A676,
serialNumber=7EEFD6CD19B53F91B65DAD89AA72A32B839329DB6184B40A0F533230BD96705E, cn=BABURAO MAHADU ASOLE
Date: 2022.03.28 15:17:35 +05'30'

(बा. म. आसोले)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंई ४०० ०३२.
३) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) मा. राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) मा. विरोधीपक्षनेते, महाराष्ट्र विधानपरिषद/महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२.
६) सर्व सन्मानीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) अपर मुख्य सचिव (सामाजिक न्याय), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
११) प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
१२) आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
१५) संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
१६) सर्व विभागीय कृषी सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१७) सर्व जिल्हा अधीक्षक कृषी अधिकारी/तालुका कृषी अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१८) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१९) महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) मुंबई /नागपूर.
२०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२१) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई.
२२) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२३) सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२.
२४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
२५) कक्ष अधिकारी (२-अे), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२६) निवड नस्ती/९-अे.